**भिवंडी-कल्याण-शिळ रस्त्याची सुधारणा करणे**
**महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास उद्योजक म्हणून घोषित करणे.**

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्रमांक-खाक्षेस-२००४/प्र.क्र.३२५/रस्ते-८.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २३ फेब्रुवारी,२०११

**संदर्भ :-** शासन निर्णय क्रमांक-खाक्षेस-२००४/प्र.क्र.३२५/रस्ते-८,दिनांक २४.७.२००६

**पार्श्वभूमी-** ठाणे जिल्ह्यातील शिळफाटा-कल्याण-भिवंडी बायपास जंक्शन या २१.६५ कि.मी. लांबीच्या रस्त्याच्या रू.२२८.३३ कोटी प्रकल्प किंमतीच्या कामासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास उद्योजक म्हणून घोषित करण्यास व हे काम खाजगीकरणाच्या माध्यमातून बांधा, वापरा व हस्तांतरित करा या तत्वावर म.रा.र.वि. महामंडळामार्फत पार पाडण्यास संदर्भाधिन दिनांक २४.७.२००६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर प्रकल्प राबविण्यासाठी सर्व शासकीय/निमशासकीय यंत्रणांमध्ये समन्वय साधण्यासाठी म.रा.र.वि.महामंडळाचे उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समिती स्थापन करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर प्रकल्पाच्या संबधात श्री.दिनेश नायकवाड व श्री. संदीप पां. पाटील यांनी मा. उच्च न्यायालय,मुंबई येथे अनुक्रमे जनहित याचिका क्र.११९/२००६ व जनहित याचिका क्र.१८९/२००९ दाखल केल्या होत्या. सदर याचिकांबाबत मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे एकत्रित सुनावणी होउन मा.उच्च न्यायालयाने दिनांक ६.१२.२०१० च्या आदेशान्वये वरील दिनांक २४.७.२००६ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या सुकाणू समितीमध्ये त्या विभागातील संबधित चार व्यक्तींचा सदस्य म्हणून समावेश करण्याचे आदेश दिले आहेत. सदर आदेशाच्या अनुषंगाने दिनांक २४.७.२००६ च्या शासन निर्णयान्वये स्थापन केलेल्या सुकाणू समितीमध्ये या नवीन सदस्यांचा समावेश करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-** संदर्भांकित दिनांक २४.७.२००६ च्या शासन निर्णयान्वये, सदर प्रकल्प राबविण्यासाठी सर्व शासकीय/निमशासकीय यंत्रणांमध्ये समन्वय साधण्यासाठी म.रा.र.वि.महामंडळाचे उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या सुकाणू समितीच्या समितीमध्ये सदस्यांचा समावेश करण्याचा शासनाने निर्णय घेतला असून, या समितीचे सदस्य पुढीलप्रमाणे राहतील.:-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | सह व्यवस्थापकीय संचालक,म.रा.र.वि.महामंडळ | - | सदस्य |
| २) | विभागीय आयुक्त,कोकण विभाग | - | सदस्य |
| ३) | आयुक्त,कल्याण-डोंबिवली महानगरपालिका | - | सदस्य |
| ४) | मुख्य अभियंता,सा.बां.प्रादेशिक विभाग,मुंबई | - | सदस्य |
| ५) | जिल्हाधिकारी,ठाणे | - | सदस्य |
| ६) | अधिक्षकअभियंता,महाराष्ट्र औद्योगीक विकास महामंडळ,डोंबिवली विभाग, | - | सदस्य |
| ७) | श्री. नरेंद्र पोदार,अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य टेक्स्टाईल प्रोसेसर्स असोशियशन, | - | सदस्य |
| ८) | श्री. मुरली अय्यर,अध्यक्ष,कल्याण अंबरनाथ मॅन्युफॅक्चरस् असोशियशन, | - | सदस्य |
| ९) | श्री. श्रीराम गजानान पाटील,शिक्षक व सामाजिक कार्यकर्ता. | - | सदस्य |
| १०) | मुख्य अभियंता,म.रा.र.वि.महामंडळ,मुंबई | - | सदस्य सचिव |

तसेच आवश्यकता वाटल्यास इतर संबंधित अधिकाऱ्यांस बैठकीसाठी निमंत्रित करण्याचे अधिकार समितीस राहतील.

२. वरील समिती वेगवेगळ्या यंत्रणांशी समन्वय साधून त्या यंत्रणा त्यांच्या सेवा पुरविण्यासाठी रस्ता खोदताना शासकीय निधीचा दुरूपयोग होणार नाही व जनतेची कमीत कमी गैरसोय होईल,याची खातरजमा करेल.

३. या प्रकल्पाशी संबधित भागातील लोक/सदर भागात कामाची जागा असलेले लोक, त्यांनी केलेल्या तक्रारीची/गाऱ्हाण्यांची योग्य दखल घेण्याकरिता सदर समितीकडे किंवा समितीच्या कोणत्याही सदस्याकडे निवेदन सादर करू शकतील. तसेच सार्वजनिक वित्तीय साधनांचा योग्य पद्धतीने वापर केला जातो याचीही सुकाणू समिती खातरजमा करेल.

४. सदर समन्वय समिती वरील जनहित याचिकाकर्त्यातर्फे मांडलेल्या खालील सूचना विचारात घेईल व योग्य ती कार्यपद्धती ठरवेल.

(अ) विविध सेवा पुरविणा-या वेगवेगळ्या यंत्रणांमध्ये समन्वय साधण्याच्या दृष्टीने कोणत्याही रस्त्याचे बांधकम/दुरुस्ती/देखभालीचे काम सुरु करण्याची परवानगी देण्यापूर्वी अशी परवानगी देणा-या खात्याने अशा सेवा वाहिन्या अस्तित्वात असल्याची खात्री करुन घ्यावी व कोणत्या प्रकारची कामे करण्यात येणार आहेत याबाबत सेवावाहिन्यांच्या संस्थेस कळविण्यात यावे.

(ब) सेवा वाहिन्या पुरविणा-या यंत्रणांनी या सेवा वाहिन्यांच्या सद्य:स्थितींची पाहणी करुन, त्यांची दुरुस्ती, पुनर्बांधणी आवश्यक आहे का किंवा भविष्यातील गरजांच्या दृष्टीने जादा सेवा वाहिन्या टाकणे आवश्यक आहे का याचा आढावा घ्यावा, आणि अशा कामांची आवश्यकता असल्यास, प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात करण्यापूर्वी एकमेकांशी समन्वय साधून अशी कामे एकाच वेळी पार पाडावीत.

(क) या सर्व यंत्रणांच्या वेळोवेळी बैठका घेण्यात याव्यात आणि रस्त्यांचे बांधकाम एकदा पूर्ण झाल्यावर या यंत्रणांना कोणत्याही परिस्थितीत हा रस्ता खणण्याची परवानगी देण्यात येऊ नये. आत्यंतिक निकड भासली तरच या रस्त्याचे बांधकाम व देखभाल करणा-या मुख्य कंत्राटदारामार्फतच मंजूर मानकांनुसार हा रस्ता खणणे व त्याची पुनर्बांधणी करणे ही कामे करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय शासनाच्या www.Intranet.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०२२३२०५०५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

23.2.2011

( सं. श्री. सोलंकी )
उप सचिव

प्रत,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
मा.मंत्री,सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव.
मा.मंत्री,सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री,सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव.
सर्व मा. मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
सर्व विधान परिषद/ विधान सभा सदस्य.
मा. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई.
अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव (१)/प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
सचिव (रस्ते)/ सचिव (बांधकामे),सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
सचिव, पर्यावरण विभाग,मंत्रालय,मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग
विभागीय आयुक्त,कोकण विभाग,नवी मुंबई.
उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मुंबई.
सह व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मुंबई.
आयुक्त,कल्याण-डोंबिवली महानगरपालिका,कल्याण.
जिल्हाधिकारी,ठाणे.
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई.
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),नागपूर.
अधिदान व लेखाधिकारी,मुंबई/निवासी लेखाधिकारी,मुंबई.
मुख्य अभियंता,सा.बां.प्रादेशिक विभाग,मुंबई
मुख्य अभियंता,महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मुंबई.
अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,ठाणे.
संबधित सदस्य (उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक,म.रा.र.वि.महामंडळ,मुंबई यांचेमार्फत.)
सहाय्यक प्रबंधक,मा. उच्च न्यायालय,(अपील शाखा) मुंबई, (पत्राद्वारे)
सर्व अधिकारी/कार्यासने,सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई./निवड नस्ती ( रस्ते-८)